**<u>सुधारीत प्रशासकीय मान्यता-</u>**
**देवणी, जिल्हा लातूर येथे नविन न्यायालयीन इमारतीचे बांधकाम करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. सीसीबी-११२१/प्र.क्र.७१/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय , मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- २६ एप्रिल, २०२२.

<u>पहा</u> :- मा.प्रबंधक (निरिक्षणे-२), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे
क्र. बी (डब्ल्यू)६०२५/२०१०(३०)/१२०२/२४८०३, दिनांक २९ सप्टेंबर, २०२१ चे पत्र.

<u>प्रस्तावना</u> :-

उपरोक्त संदर्भाधिन अ.क्र.१ च्या पत्रान्वये देवणी, जि. लातूर येथे नविन न्यायालयीन इमारत बांधकाम करण्याकरीता रु.१४,९५,८१,०००/- इतक्या अंदाजित खर्चाचा सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्याकडून शासनास सादर करण्यात आला होता. सदरहू प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

**देवणी, जि. लातूर येथे नविन न्यायालयीन इमारत बांधकाम करण्याकरीता रु.१४,९५,८१,०००/- (रुपये चौदा कोटी पंच्याण्णव लक्ष ऐक्याऐंशी हजार फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

| अ.क्र. | बाब | सुधारित प्रशासकीय मान्यतेची रक्कम |
|---|---|---|
| १ | मुख्य इमारत बांधकाम | ९,६७,६६,६७०/- |
| २ | बाह्य पाणीपुरवठा व मल:निसारण | |
| ३ | संरक्षक भिंत व गेट | |
| ४ | अंतर्गत रस्ते | |
| ५ | रेनवॉटर हार्वेस्टींग | |
| ६ | बागबगिचा | |
| ७ | लॅन्ड डेव्हलपमेंट | |
| ८ | पेवींग ब्लॉक | |
| ९ | गॅरेज ॲन्ड पार्कींग | |
| १० | प्लींथ प्रोटेक्शन | |
| ११ | ध्वज स्तंभ | |
| १२ | हरित इमारत संकल्पना | |
| १३ | पंपहाऊस व बोअरवेल | |
| १४ | बाह्य स्वच्छतागृह | |
| १५ | वॉचमनकेबीन | |
| १६ | विद्युत | १,०६,४९,१९५/- |
| १७ | निविदा जास्त दराची | ४४,१९३/- |

| | | |
|---|---|---|
| १८ | अग्नी प्रतिबंधक उपाय | ८,४७,९०९/- |
| १९ | फर्निचर | १,३०,००,०००/- |
| २० | माती परिक्षण | २,००,०००/- |
| २१ | सोलार यंत्रणा | २०,००,०००/- |
| २२ | वातानुकूलीत यंत्रणा | ५,००,०००/- |
| २३ | आकस्मिक खर्च | ३८,७२,४३५/- |
| २४ | वस्तू व सेवा कर | १,४८,८०,९५६/- |
| २५ | भाववाढ | ६२,००,३९८/- |
| २६ | कामगार विमा | ६,२०,०४०/- |
| | **एकूण** | **१४,९५,८१,१२६/-** |
| | **म्हणजेच एकूण रूपये** | **१४,९५,८१,०००/-** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

इ) सावर्जनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय, क्र.बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ई) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

फ) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, सीव्हीसी तत्वे, वित्तीय मर्यादा व विहित निविदा कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

ग) सदर सुधारीत प्रशासकीय मान्यतेतील तांत्रिक बाबी, निविदा विषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१, कार्यालयीन इमारती-०५१, बांधकाम- कार्यक्रमांतर्गत- (०३) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना- राज्य हिस्सा), (०३) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३- मोठी बांधकामे (४०५९ ०६७२) व (२१) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना- केंद्र हिस्सा), (२१) (०१) मोठी बांधकामे(कार्यक्रम),५३-मोठी बांधकामे (४०५९ १२२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. **मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १२९/२०२१/इमा-२, दिनांक ११ ऑक्टोबर, २०२१, नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक : २१४/१४४३, दिनांक २२ नोव्हेंबर, २०२१, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ११५०/व्यय-५, दिनांक १५ डिसेंबर, २०२१ आणि मा.उपमुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखालील व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक २४

फेब्रुवारी, २०२२ रोजी झालेल्या बैठकीत समितीने दिलेल्या मान्यतेनुसार आणि वित्त विभाग, शासन निर्णय क्र:-विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/१३/विनियम,भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२६१५१६०६४०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2022.04.26 15:18:20 +05'30'

**( नितीन वि. जीवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४) मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय , मुंबई,
५) मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, लातूर.
६) मा.प्रबंधक (निरीक्षणे-२) अपिल शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन, नागपूर,
८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड.
९) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, लातूर.
१०) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, निलंगा.
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
११) उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम, देवणी.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग (ईमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५) नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७) कक्ष अधिकारी, का.७, ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८) निवड नस्ती/संग्रहार्थ.